**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन आदेश क्रमांकः प्रतिनि २५२०/ प्र.क्र. ७४/ का.१४-अ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक : १० जुलै, २०२०

## शासन आदेश

श्रीमती. संगिता कणाविया, निवडश्रेणी लघुलेखक, जलसंपदा विभाग यांची खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून, आयुक्त बृहन्मुंबई महानगर पालिका यांचे कार्यालयात प्रतिनियुक्तीने नियुक्ती १ वर्षाच्या कालावधीसाठी निवडश्रेणी लघुलेखक या पदावर करण्यात येत आहे.

अ) श्रीमती. संगिता कणाविया, निवडश्रेणी लघुलेखक, जलसंपदा विभाग या ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला त्या आपल्या शासकीय पदाचा कार्यभार पुन्हा स्विकारतील त्या तारखेला समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टिने शासनास आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकारी शासन/ सक्षम प्राधिकाऱ्यास राहील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र या प्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला/ सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्याची नोटीस दिली पाहिजे

ड) श्रीमती कणाविया यांनी मुळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी ३ महिन्यांची लेखी नोटीस शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मुळ विभागाकडे परत येण्याची मुभा राहील.

२. श्रीमती. संगिता कणाविया, निवडश्रेणी लघुलेखक, जलसंपदा विभाग यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत असल्याने महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा....इ.) नियम १९८१ मधील नियम ४० (परिशिष्ट दोन) मधील तरतुदी विचारात घेता जलसंपदा विभाग व नगर विकास विभाग यांनी त्यांच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती आपापसात ठरवाव्यात.

३. श्रीमती. संगिता कणाविया, निवडश्रेणी लघुलेखक, जलसंपदा विभाग यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी जलसंपदा विभागामार्फत हाताळण्यात येतील. जलसंपदा विभागाने प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होण्यासाठी श्रीमती. संगिता कणाविया, निवडश्रेणी लघुलेखक यांना कार्यमुक्त करावे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२००७१०११३९३०८३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2020.07.10 12:13:48 +05'30'

**( ग.भि.गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२) अ.मु.स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४) आयुक्त, बृहन्मुंबई महानगर पालिका, मुंबई.
५) अ.मु.स./ प्रधान सचिव, जलसंपदा विभाग / नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई
६) सह / उप सचिव (आस्थापना), जलसंपदा विभाग / नगर विकास विभाग,मंत्रालय, मुंबई
७) श्रीमती. संगिता कणाविया, निवडश्रेणी लघुलेखक, जलसंपदा विभाग मंत्रालय, मुंबई.
८) कार्यालय १४-अ संग्रहार्थ